जिल्हाधिकारी, मुंबई शहर कार्यालयातील थकीत प्रलंबित वीज देयके अदा करण्यास मंजुरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक-संकीर्ण-२०२४/प्र.क्र.४६/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २८ मार्च, २०२४.

**संदर्भ** :- १. जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांचे पत्र क्र. लेखा/टे-४/वि.देयक/अनु.मा./२०२३ २४/ १६१२, दि.२०/०३/२०२४
२. प्र. सहायक संचालक (लेखा) कोकण विभाग,यांचे पत्र क्र. लेखामेळ/आरसीएन/ १-२०५३ अनुदान मागणी/२०२४/६०, दि.२१/०३/२०२४.

**प्रस्तावना :-**

जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्या संदर्भाधिन दिनांक २०/०३/२०२४ रोजीच्या पत्रान्वये जिल्हाधिकारी, मुंबई शहर कार्यालयातील माहे मार्च,२०११ ते फेब्रुवारी,२०२४ व नोव्हेंबर,२०१२ ते फेब्रुवारी,२०२४ पर्यंतची थकित प्रलंबित वीज देयके एकूण रुपये ५१,४६,०६०/- पैकी लेखाशीर्ष (२०५३००२८)-०६ मध्ये चालू आर्थिक वर्षातील मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतील शिल्लक निधीमधून रुपये ३३,५३,०००/- इतक्या रकमेची देयके (व्याज व विलंब प्रदान शुल्कासहित) बेस्ट उपक्रमास अदा करण्यासाठीच्या खर्चास मंजूरी देण्याचा सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

जिल्हाधिकारी, मुंबई शहर कार्यालयातील माहे मार्च,२०११ ते फेब्रुवारी,२०२४ व नोव्हेंबर,२०१२ ते फेब्रुवारी, २०२४ या कालावधीतील सहा वर्षाहून अधिक कालावधीपासून प्रलंबित असलेले वीज मीटरची थकीत देयकांची रक्कम बृहन्मुंबई विद्युत पुरवठा आणि परिवहन उपक्रम (बेस्ट) यांना अदा करण्यासाठी एकूण रुपये ५१,४६,०६०/- पैकी लेखाशीर्ष (२०५३ ००२८) -०६ मध्ये चालू आर्थिक वर्षातील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतील शिल्लक निधीमधून रुपये ३३,५३,०००/- (अक्षरी रुपये तेहतीस लक्ष त्रैपन्न हजार फक्त) देयके (व्याज व विलंब प्रदान शुल्कासहित) अदा करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देत आहे.

२. सदहू खर्च "मागणी क्र. सी-१, २०५३ जिल्हा प्रशासन (००)०९३ जिल्हा आस्थापना (०१) सर्व साधारण आस्थापना (०१)(०१)आयुक्त कोकण (२०५३००२८) ०६-दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क" या लेखाशीर्षाखालील चालू वित्तीय वर्ष सन २०२३-२४ च्या मंजूर अर्थसंकल्पीय अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये सदरहू वित्तीय नियमावली १९७८, भाग पहिला, उपविभाग- एक, अनुक्रमांक ६, नियम क्रमांक ४० अन्वये ६ वर्षापेक्षा जास्त कालावधीपर्यंत प्रलंबित राहिलेल्या देयकांना मंजूरी देण्याचे अधिकार

प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेले आहेत. उक्त अधिकाराचा वापर करुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३२८१२०८४८८७१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRIRAM
DATTATRAYA YADAV

Digitally signed by SHRIRAM DATTATRAYA YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=9da0e03bd84c1e17d78ad320814d003150fbf7d2abd36f924e5705145bf0e270, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=50CB0CE4CC4FE54C74F42B860354E86EC00B3B36F5F215C9F7658E611006A200, cn=SHRIRAM DATTATRAYA YADAV
Date: 2024.03.28 12:29:50 +05'30'

**( श्रीराम यादव )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) विभागीय आयुक्त, कोकण विभाग,कोकण.
२) जिल्हाधिकारी, मुंबई शहर.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा),१,महाराष्ट्र, मुंबई
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
६) उप सचिव, (कार्यासन व्यय-९/अर्थ-६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) सह सचिव/उपसचिव (कार्यासन ब-१) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवड नस्ती (कार्यासन ई-८), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.